आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत...
(लेखाशिर्ष २२२५एफ१०२)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/ प्र.क्र. ०२/ कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २४ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४,दि. १२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५
३) प्राचार्य, सैनिकी शाळा, चंद्रपूर यांचे दि.१०.०३.२०२५ रोजीचे पत्र.
४) कार्यासन-१२ नस्ती क्रमांक मसैशा-२०२५/प्र.क्र.४२/प्र.क्र.१२

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता या योजनेतून सैनिकी शाळा, मु. भिवकुंड, पो. विसापूर, ता. बल्लारपूर, जि. चंद्रपूर येथे शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमाती प्रवर्गातील एकूण ०५ विद्यार्थ्यांचा एकूण रु.८.८७४१५ लाख इतका निर्वाह भत्ता अदायगीसाठी संदर्भ क्र.(०३) येथील पत्रान्वये शासनास प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावानुसार सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या निधी मर्यादेत सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता या योजनेतून सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमाच्या मागणी क्र. टी-५ मधील मुख्य लेखाशिर्ष, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण अंतर्गत सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या

विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदीतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पीत तरतूद** | **यापूर्वी वितरीत निधी** | **या शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता | २२२५एफ १०२ | ३४-शिष्यवृत्या /विद्यावेतने | ५०.०० | ९.१०७६७ | ८.८७४१५ |

२. उपरोक्त प्रमाणे **रु. ८.८७४१५ लाख (अक्षरी रुपये आठ लाख सत्त्याऐंशी हजार चारशे पंधरा फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) निधी वितरीत व खर्च करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमधील वित्तीय नियम, तसेच वित्त विभागाने संदर्भ क्र.(१) व (२) येथील शासन परिपत्रकान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे आणि विहित कार्यपद्धतीचे संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर लेखाशिर्षाखाली वितरीत केलेला निधी दि. ३१.०३.२०२५ पर्यंत खर्ची पडेल, याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच, आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदींतून केवळ अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत व प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०३२४१३२८३०३६२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2025.03.24 13:29:23 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ ठाणे/ अमरावती.
७. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.